सर्वभूतरतवृत्तीच्या विचारसरणीशीं जमेल असाच असल्यामुळे त्याला वामनरावांचा आशीर्वाद मिळाला यांत नवल नाही.

वामनरावांच्या ह्या फक्त चार प्रमुख ललितकथांतून व्यक्त झालेल्या त्यांच्या जीवनविषयक तत्त्वज्ञानाचें स्वरुप कोणत्या प्रकारचें आहे याची ठोकळपणे चर्चा केली. त्यांतून निष्कर्ष निघाला तो असा की त्यांच्या ह्या सगळयाच ललित-वाङ्मयांत अनुस्यूत झालेलें तत्त्वज्ञान एकरुपात्मक आहे. तें एकाच व्यापक सर्वभूतहितात्मक विचारसरणींतून उत्क्रान्त झालेलें आहे; त्याला अधून मधून सबल वैचारिकांची जोड मिळालेली असली व कांही ठिकाणी त्यांतील कांही विशिष्ट प्रश्नांवरच कटाक्षाने अधिक प्रकाश पाडलेला असला, तरी त्याच्या सुसूत्रपणांत कोठेंहि बिघाड आलेला नाही. अगदीं पहिल्या ललितकथेपासून तो शेवटच्या लिखितापर्यंत तें एकसंघ आहे असेंच दिसून येतें. ह्याचें कारण उघडच आहे : वामनरावांनी ज्या काळी आपली पहिली कादंबरी लिहिली त्याचकाळी त्यांच्या मनाची एक विशिष्ट स्वरूपाची तात्त्विक बैठक तयार झालेली होती, वाचनाने, मननाने व प्रत्यक्ष आचरणाने त्यांनी आपल्या डोळयापुढे नीतिविषयक कांही विशिष्ट ध्येयें व जीवनविषयक कांही विशिष्ट मूल्यें आकारलीं होतीं, त्याचा निधिध्यास लावून घेतला होता, तीं अंगीं बाणण्याचा प्रयत्न केलेला होता : त्यामुळे त्यांतून अंकुरित झालेलें जीवन-विषयक तत्त्वज्ञान त्यांच्या पुढील ललितकृतींतून अधिक पल्लवित व फलभाराने युक्त झालेलें असलें तरी अगदीं अखेरपर्यंत त्याच्या पूर्वरुपाला बाधा आलेली नाही, हें लक्षांत घेण्याजोगें आहे. वामनरावांच्या तत्त्व-चिंतनात्मक वाङ्मयाच्या सागराला येऊन मिळणाऱ्या ह्या त्यांच्या ललितकृतींच्या सरितेचें पात्र तिच्या उगमस्थानापाशींच डोळयांत भरेल इतकें विस्तीर्ण आहे : तिला फारशा उपनद्या जशा मिळालेल्या नाहीत तसेंच सागराला येऊन मिळण्यापूर्वी तिने फारशी वळणेंहि घेतलेलीं नाहीत. ह्या नदींत स्नान केल्यानंतर आपल्यामध्ये ‘ सद्विचार करण्याची व ओळखण्याची, तसेंच सद्भावनांनी प्रेरित होण्याची व त्यांचीं मूल्यमीमांसा करण्याची शक्ति ” आलेली आहे, असें जर आपणांस आढळून आलें तर त्यांत ‘ मला धन्यता वाटेल ’ असे उद्गार स्वतः वामन मल्हारांनीच काढले आहेत.

## प्रस्तुत व्याख्यानांसाठीं उपलब्ध झालेलें प्रो. वा. म. जोशी ह्यांचें वाङ्मय :

**कादंबऱ्या :**

रागिणी १९१५
आश्रमहरिणी १९१६
नलिनी १९१९
सुशिलेचा देव १९३०
इंदु काळे व सरला भोळे १९३५

**स्मृति-चित्रात्मक :**

स्मृति-लहरी.

**कथात्मक :**

नवपुष्पकरंडक १९१६

**चर्चात्मक :**

नीतिशास्त्रप्रवेश १९१९
साक्रेटिसाचे संवाद ( लेखन १९१५-१६ ) प्रकाशन १९२२
आधुनिक सुशिक्षितांचा वेदान्त ( पुरवणी )
विचार-विलास १९२७
विचार-सौंदर्य १९४०
विचार-लहरी १९४३

**नाटक :**

विस्तवाशी खेळ १९४०.

**असंग्रहित लेख :**

'बहिष्कार योग व आपला जोर'—प्रकाशन : 'विश्ववृत्तमासिकांतील निवडक लेख' सं. विजापूरकर.

इतिहासाचा उपयोग—लोकशिक्षण. जाने. १९२८.

गीतेंत कार्याकार्यनिर्णयाची कसोटी आहे काय ?—लोकशिक्षण एप्रिल १९३६.

